राज्यातील कृषि विद्यापीठांतर्गत शिक्षकवर्गीय कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ६० वरून ६२ वर्षे करण्याबाबत...

# महाराष्ट्र शासन

## कृषी, पशुसंवर्धन, दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग

## शासन निर्णय क्रमांकः मकृवि१२१५/प्र.क्र.७७/६ए

मंत्रालय विस्तार, मुंबई - ४०० ०३२

तारीख: ४ एप्रिल, २०१५

**वाचा :**

१) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.कृषिआ १००७/प्र.क्र.११/६-अे, दि.३१/१०/२००७

२) कृषि व पदुम विभागाचा शासन निर्णय क्र.अेयुजी ११०९/सीआर-२५२/६-अे, दि.३१/१०/२००७

३) उच्च व तंत्र शिक्षण विभाग,शासन निर्णय क्र.संकीर्ण २०१०/(५०३/१०)/विशि-१, दि.५/३/२०११

४) महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, पुणे यांचे पत्र क्र.मकृप/आस्था-२/१९११/१५२७/२०११, दि.११/७/२०१२.

**प्रस्तावना**

राज्यातील चारही कृषि विद्यापीठातील शिक्षक वर्गीय कर्मचाऱ्यांना विद्यापीठ अनुदान आयोगाची वेतनश्रेणी दि. १/१/२००६ पासून लागू करण्याबाबतचे आदेश दि.१८/३/२०१० अन्वये निर्गमित करण्यात आलेले आहेत. विद्यापीठ अनुदान आयोगाने ही वेतनश्रेणी लागू करतांना शिक्षकवर्गीय कर्मचाऱ्यांसाठी ६२ वर्षे अशी सेवा निवृत्तीची वयोमर्यादा शिफारस केलेली आहे. तथापि, त्यामुळे राज्य शासनाने राज्यातील कृषि विद्यापीठातील शिक्षकवर्गीय कर्मचाऱ्यांना सेवानिवृत्तीची वयोमर्यादा ६० वर्षे ठेवण्याचा निर्णय कायम ठेवला होता.

२. केंद्र शासनाने राज्य कृषि विद्यापीठे व मध्यवर्ती कृषि विद्यापीठ इन्फाळ मणिपूर येथील शिक्षकवर्गीय कर्मचाऱ्यांची सेवा निवृत्तीची वयोमर्यादा ६२ वर्षे करण्यात आली आहे व राज्यातील पारंपारिक (बिगरकृषि) विद्यापीठातील शिक्षकवर्गीय कर्मचाऱ्यांची सेवानिवृत्तीची वयोमर्यादा ही ६२ वर्षाची आहे. त्या अनुषंगाने महाराष्ट्रातील कृषि विद्यापीठातील शिक्षकवर्गीय कर्मचाऱ्यांच्या सेवा निवृत्तीची वयोमर्यादा ६० वर्षावरून ६२ वर्षे करण्यात यावी अशी मागणी राज्यातील चारही कृषि विद्यापीठातील विविध प्राध्यापक संघटना सातत्याने शासनाकडे करीत होते.

३. महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषदेच्या दि. १७ ऑक्टोबर, २०११ रोजी महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी येथे मा. मंत्री, कृषि तथा अध्यक्ष, कृषि परिषद यांच्या अध्यक्षतेखाली झालेल्या ८५ व्या बैठकीमध्ये ठराव क्र.३०/८५/२०११ अन्वये विद्यापीठ अनुदान आयोगाच्या नियत वयोमानानुसार सेवानिवृत्तीच्या वयाबाबत देण्यात आलेल्या निर्देशातील अटी शर्तीस अधिन राहून राज्यातील कृषि विद्यापीठातील शिक्षकवर्गीय कर्मचाऱ्यांचे सेवानिवृत्तीचे वय ६० वरून ६२ वर्षे करण्याबाबत शिफारस करण्यात आली होती. सदरचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधिन होता.

## शासन निर्णय :

या अनुषंगाने शासनाने असा निर्णय घेतला आहे की, राज्यातील चारही कृषि विद्यापीठातील सहायक प्राध्यापक /सहयोगी प्राध्यापक / प्राध्यापक/अधिष्ठाता/संचालक दर्जाच्या अध्यापकांच्या सेवानिवृत्तीची वयोमर्यादा ६० वर्ष वरून वय ६२ करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय दि.२७/०२/२०१५ पासून अंमलात येईल.

हा शासन निर्णय वित्त विभागाच्या सहमतीने व अनौपचारकि संदर्भ क्र.३४ /१५/सेवा-४, दि. ११.०३.२०१५ अन्वये निर्गमित करण्यात येत आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१५०४०४१४३९०५६००१ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Kamlakar Yeshvant Vanjare

Digitally signed by Kamlakar Yeshvant Vanjare
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Agriculture and ADF, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Kamlakar Yeshvant Vanjare
Date: 2015.04.04 14:53:51 +05'30'

**क. य. वंजारे**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत :**

१. मा. राज्यपाल यांचे सचिव, राजभवन, मलबार हिल
२. मा. मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३. मा. उप मुख्यमंत्री यांचे सचिव
४. सर्व मा. मंत्री / मा. राज्यमंत्री
५. मा. मुख्य सचिव, महाराष्ट्र शासन, मुंबई
६. सर्व अप्पर मुख्य सचिव/ प्रधान सचिव/सचिव, मंत्रालय, मुंबई
७. सदस्य सचिव, महाराष्ट्र कृषि शिक्षण व संशोधन परिषद, भांबुर्डा भोसलेनगर, पुणे (५ प्रती)
८. कुलगुरू/कुलसचिव/नियंत्रक, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी (१० प्रती)
९. कुलगुरू/कुलसचिव/नियंत्रक, महात्मा फुले कृषि विद्यापीठ,राहुरी, जि.अहमदनगर (१० प्रती)
१०. कुलगुरू/कुलसचिव/नियंत्रक, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी (१० प्रती)
११. कुलगुरू/कुलसचिव/नियंत्रक, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला (१० प्रती)
१२. आयुक्त (कृषि), महाराष्ट्र राज्य, पुणे

१३.महासंचालक, माहिती व जनसंपर्क महासंचालनालय, मंत्रालय, मुंबई

१४.महालेखापाल-१ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, मुंबई

१५.महालेखापाल-२ (लेखापरिक्षा/लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र राज्य, नागपूर

१६.उप विभागीय कृषि अधिकारी, अहमदनगर, रत्नागिरी, परभणी, अकोला

१७.जिल्हा कोषागार अधिकारी, अहमदनगर, रत्नागिरी, परभणी, अकोला

१८.जिल्हा लेखा परिक्षक, स्थानिक निधी लेखा, वसंतराव नाईक मराठवाडा कृषि विद्यापीठ, परभणी, महात्मा फुले कृषि विद्यापीठ, राहुरी,अहमदनगर, डॉ. बाळासाहेब सावंत कोकण कृषि विद्यापीठ, दापोली, जि. रत्नागिरी, डॉ. पंजाबराव देशमुख कृषि विद्यापीठ,अकोला

१९. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई

२०. सामान्य प्रशासन विभाग, उच्च व तंत्र शिक्षण विभाग, नियोजन विभाग

२१. वित्त विभाग (सेवा-४) (व्यय-१) अर्थ १२(विनिमय), मंत्रालय, मुंबई

२२. कक्ष अधिकारी, कार्यासन २-अे/६-अे/८-अे, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई